**पर्यटन विभाग (खुद्द) व विभागाच्या अधिनस्त असलेल्या पर्यटन संचालनालय व महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ यांच्यासाठी बोधचिन्ह (Logo) व घोषवाक्य (Tagline) वापरण्यास शासन मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक टिडीएस २०२४/०७/प्र.क्र.३५/पर्यटन-३,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २६ जुलै, २०२४.

**प्रस्तावना :-**

राज्यातील पर्यटन स्थळांची राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर व्यापक प्रसिध्दी करण्यात येऊन देशी-विदेशी पर्यटकांना आकर्षिक करणे व त्याद्वारे राज्यातील पर्यटन विकासास चालना देऊन महाराष्ट्र राज्यास जगातील एक अग्रगण्य पर्यटन क्षेत्र म्हणून नावारुपाला आणण्यासाठी पर्यटन विभागामार्फत धोरण निश्चित करण्यात येते. सदर धोरणाची अंमलबजावणी पर्यटन विभागाच्या अधिनस्त असलेल्या पर्यटन संचालनालय व महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळामार्फत करण्यात येते. सध्याच्या माहिती व तंत्रज्ञानाच्या युगात कोणत्याही शासनाची ओळख त्यांच्या प्रतिकाद्वारे होत असते. त्यामध्ये बोधचिन्ह (Logo) व घोषवाक्य (Tagline) हे प्रमुख घटक असतात. बोधचिन्ह हा शासनाच्या दृष्य सेवांच्या धेय धोरणांची झलक असते. तर घोषवाक्यामधुन शासनाची उद्दिष्टे प्रतिबिंबीत होत असतात. त्यामुळे पर्यटन विभाग (खुद्द), पर्यटन संचालनालय व महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ यांच्यामार्फत वापरण्यात येणाऱ्या वेगवेगळ्या बोधचिन्ह व घोषवाक्यामुळे निर्माण होणारी विसंगती दुर करुन त्यामध्ये एकसंघता आणण्यासाठी एकच बोधचिन्ह व घोषवाक्य वापरण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पर्यटन विभाग (खुद्द) व विभागाच्या अधिनस्त असलेल्या पर्यटन संचालनालय व महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ यांच्यामार्फत वापरण्यात येणाऱ्या बोधचिन्ह (Logo) व घोषवाक्य (Tagline) यांच्या वापराऐवजी **परिशिष्ट -अ**॰ मध्ये नमूद केल्याप्रमाणे एकच **बोधचिन्ह (Logo) व घोषवाक्य (Tagline)** वापरण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. अटी व शर्ती :-

i. या आदेशानंतर पर्यटन संचालनालय व महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळामार्फत पुर्वी वापरात असलेल्या बोधचिन्ह व घोषवाक्य यांचा अन्य कोणाकडूनही गैरवापर होऊ नये, या अनुषंगाने योग्य ती कार्यवाही त्या त्या कार्यालयाकडून करण्यात यावी.

ii. सदर बोधचिन्ह व घोषवाक्याच्या वापरामुळे कोणतेही आर्थिक परिणाम होणार नाहीत याची दक्षता घेण्यात यावी.

iii. सदर बोधचिन्ह व घोषवाक्य पर्यटन विभागाच्या सर्व प्रचारात्मक उपक्रमामध्ये ठळकपणे प्रदर्शित करण्यात यावे.

iv. सदर शासन निर्णयान्वये वापरात न येणारे पर्यटन विभाग (खुद्द) व अधिनस्त कार्यालयाशी संबंधित पुर्वीची बोधचिन्हे व घोषवाक्ये यापुढेही पर्यटन विभागाव्यतिरिक्त इतर कोणत्याही विभागास वापरता येणार नाहीत.

३.   सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७२६१२५६३२५७२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH VITHAL ROKADE

Digitally signed by SANTOSH VITHAL ROKADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=ECF4A9ABE84C70DE989C3669424C12B6CADCB583D500FE489CE8727916E0BBEE, cn=SANTOSH VITHAL ROKADE
Date: 2024.07.26 13:12:00 +05'30'

**( संतोष जया विठ्ठल रोकडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन,मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव , मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. राज्यमंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
७. मा. सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
८. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
९. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
१०. मा. सर्व विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई
११. मा. सर्व विधानसभा सदस्य, विधानमंडळ, मुंबई
१२. सचिव, पर्यटन यांचे स्वीय सहायक
१३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१४. महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
१५. महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
१६. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई
१७. सर्व जिल्हाधिकारी
१८. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
२०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२१. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२२. नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.
२३. वित्त विभाग (का.व्यय-१५/अर्थ-११), मंत्रालय, मुंबई.
२४. सामान्य प्रशासन विभाग (का.३४), मंत्रालय, मुंबई.
२५. अवर सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग (अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई.
२६. निवड नस्ती पर्यटन-३

***

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र.टिडीएस २०२४/०७/प्र.क्र.३५/पर्यटन-३, दि.२६/०७/२०२४ सोबतचे**

## परिशिष्ट ‘अ’




**Logo**




**Tagline**